सन २०१६-१७ करीता इको टुरि झम (राज्य) योजनेंतर्गत वनक्षेत्रातील पर्यटन स्थळांच्या विकास कामांकरिता निधी वितरण. (२४०६ २२९५) .
अ) गुलशन महल जैवविविधता उद्यान ,औरंगाबाद
आ) वेरुळ वन उद्यान ,वेरूळ जि.औरंगाबाद

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन निर्णय क्रमांक : निसप-२०१७/ प्र.क्र. ७१/फ- ५**

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक :- ०९ मे, २०१७.

वाचा :- १) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. निसप-२०१६/प्र.क्र.८७/फ-५ दि. २४/३/२०१७.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य,नागपूर यांचे पत्र क्रं. कक्ष-१/ पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.२३(१६-१७)/७१/१६-१७,दि. १३/४/२०१७

**प्रस्तावना :-**

शासन निर्णय संदर्भ क्र. १ मध्ये दि. २४/३/२०१७ अन्वये निसर्ग पर्यटन वन पर्यटन /स्थळाचा विकास २४०६ २२९५ या योजनेंतर्गत सन २०१६-१७ साठी औरंगाबाद वनवृत्तातील गुलशन महल जैवविविधता उद्यान व वेरुळ वनउद्यान या पर्यटन स्थळांच्या विकासासाठी एकुण रू १५५.४७.लक्ष निधी मंजूर करण्यात आला आहे तथापि सदरहू निधी BDS प्रणालीवर पूर्णतः वितरीत करण्यात आला नसल्याने सदरहू पर्यटन स्थळांच्या विकासासाठी निधी उपलब्ध होऊ शकला नव्हता .

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य,नागपूर यांनी संदर्भ क्र.२ दि. २४.०३.२०१७ च्या पत्रान्वये निसर्ग पर्यटन /वन पर्यटन स्थळाचा विकास (२४०६ २२९५) या योजनेंतर्गत सन २०१७-१८ साठी औरंगाबाद वनवृत्तातील गुलशन महल जैवविविधता उद्यान व वेरुळ वनउद्यान या पर्यटन स्थळांच्या विकासासाठी अनुक्रमे रु. २३.८२ लक्ष व रु. १२७.०५ लक्ष निधी वितरीत करण्याचे प्रस्तावित केले आहे. त्यास अनुसरून सदरहू पर्यटन स्थळांचा विकास करण्यासाठी सन २०१७-१८ करीता उपलब्ध अनुदानातुन निधी मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

निसर्ग पर्यटन/वन पर्यटन स्थळाचा विकास (२४०६ २२९५) या योजनेंतर्गत औरंगाबाद वनवृत्तातील गुलशन महल जैवविविधता उद्यान व वेरुळ वन उद्यान येथील पर्यटन स्थळांचा विकास करण्यासाठी शासन निर्णय संदर्भ क्र.१ दि. २४/३/२०१७ अन्वये मान्यता दिलेल्या कामांसाठी एकुण रू.१५०.८७ लक्ष (एकशे पन्नास लक्ष सत्याऐंशी हजार फक्त) निधी पुढील प्रमाणे उद्दिष्ठ निहाय मंजूर करण्यात येत आहे.

(रक्कम लाखात)

| अ.क्र. | पर्यटन स्थळाचे नाव | ०२ मजुरी | २१ पुरवठा व सामग्री | ५० इतर खर्च | एकुण |
|---|---|---|---|---|---|
| १ | गुलशन महल जैवविविधता उद्यान ,औरंगाबाद | रू.११.९१ | रू.५.९५ | रू.५.९६ | रू. २३.८२ |
| २ | वेरुळ वन उद्यान ,वेरूळ जि.औरंगाबाद | रू.६३.५२ | रू.३२.०० | रू.३१.५३ | रू.१२७.०५ |
| ३ | एकुण | रू.७५.४३ | रू.३७.९५ | रू.३७.४९ | रू.१५०.८७ |

सदरहू मान्यता शासन निर्णय संदर्भ क्र.१ दि. २४/३/२०१७ मध्ये नमुद केलेल्या अटींच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

सदर प्रस्तावातंर्गत करावयाचा खर्च एकुण रू.१५०.८७ लक्ष (एकशे पन्नास लक्ष सत्याऐंशी हजार फक्त) हा सन २०१७-१८ साठी मागणी क्र. सी-०७-२४०६ वनीकरण व वन्यजीवन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०२)(०६) इको टुरिझम (राज्य) (२४०६-२२९५) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

सदरहू शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१७ /प्र.क्र.६८/अर्थ-३ दि. १ एप्रिल, २०१७ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५१११२२९२४९९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anil N. Dhas

Digitally signed by Anil N. Dhas
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=699d21cc89897191099434d443603426329c81b1b292ed2d168c892811118cc7, cn=Anil N. Dhas
Date: 2017.05.11 12:28:01 +05'30'

**( अनिल धस )**
कक्ष अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रति,**

(१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख) , महाराष्ट्र राज्य, नागपूर
(२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) , महाराष्ट्र राज्य, नागपूर
(३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास ), महाराष्ट्र राज्य, नागपूर
(४) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), औरंगाबाद.
(५) महालेखापाल, १/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा), मुंबई/नागपूर.
(६) जिल्हा कोषागार अधिकारी,औरंगाबाद.
(७) कक्ष अधिकारी (व्यय-१०)(विनियम)/, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
(८) ब-१/फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग ,मंत्रालय, मुंबई.
(९) निवड नस्ती, फ-५.